वितरण आदेश क्र.७

"सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेचा निधी वितरीत करण्याबाबत"

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२४/प्र.क्र.३९/शिक्षण-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २४ मार्च, २०२५

**संदर्भ** :- (१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४

(२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दि.२९.०७.२०२४

**प्रस्तावना:-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व फ्रीशिप करिता ३४- शिष्यवृत्ती/ विद्यावेतने उद्दिष्टांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतूद/पुरवणी मागण्यानुसार मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना महाडीबीटी प्रणालीवरील प्रलंबित शिष्यवृत्ती/फ्रीशिपची रक्कम अदा करणेकरिता निधीचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना ३४- शिष्यवृत्ती व विद्यावेतन या उद्दिष्टांतर्गत प्रलंबित असलेली शिष्यवृत्ती / फ्रीशीप अदा करण्यासाठी मंजूर अर्थसंकल्पीय+पूरक मागणी तरतुदीपैकी वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या अनुषंगाने खालील विवरणपत्रात नमूद लेखाशिर्षाकरिता एकूण **रू. ७७३.८४७८ कोटी (अक्षरी रुपये सातशे त्र्याहत्तर कोटी चौऱ्याऐंशी लाख**

**अठ्ठयाहत्तर हजार फक्त)** इतका निधी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

**(रुपये कोटीत)**

| लेखाशीर्ष | मुळ तरतूद | पुरवणी मागणी | एकूण तरतूद | वित्त विभागाने वितरीत निधी | संचालक,इ.मा. ब.क यांना यापूर्वी वितरीत निधी | संचालक,इ.मा.ब.क यांना वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| २२२५ई८८४ | ५८०.००० | ६३२.२०० | १२१२.२०० | १२१२.२०० | १०१५.६६० | १९१.५३० |
| २२२५ई९०१ | १५.००० | १९.६७० | ३४.६७० | ३४.६७० | २९.९४० | ४.७२०८ |
| २२२५ई९१९ | २००.००० | ११८.२०० | ३१८.२०० | ३१८.२०० | २९४.१३० | १९.०६० |
| २२२५ई९३७ | ५.००० | ६.२७४० | ११.२७४ | ११.२७४० | ८.१३७० | ३.१३७ |
| २२२५ई९४६ | १३५.००० | १५०.१८० | २८५.१८० | २८५.१८० | २४१.८७० | ३८.३०० |
| २२२५ई ९७३ | २२५.००० | २३८.५९० | ४६३.५९० | ४६३.५९० | ३२८.९७० | १२९.६१० |
| २२२५F००२ | ६३०.००० | १००९.३३० | १६३९.३३० | १६३९.३३० | १२४१.८३० | ३८७.४९० |
| **एकूण** | **१७९०.०००** | **२१७४.४४४** | **३९६४.४४४** | **३९६४.४४४** | **३१६०.५३७** | **७७३.८४७८** |

२. सदर योजनेकरिता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातून खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च

करतांना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकामधील अटींची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करुन निधी वितरीत करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२४१६०३४३२५३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH SHRIDHAR DHAWLE

Digitally signed by PRAKASH SHRIDHAR DHAWLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=eadb2369514cf114fb080a75acc2ae8dcf8591b733bb6f63612246049721dfca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60C3A22DD966735D3A1B24AA927CFEE6BED87B4A378083D720DF90D57B2125D8, cn=PRAKASH SHRIDHAR DHAWLE
Date: 2025.03.24 16:04:54 +05'30'

**(डॉ.प्रकाश धावले)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
९. सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवड नस्ती (शिक्षण-१)